पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२२/प्र.क्र.२६ /नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ३ जुलै, २०२३.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र. का-२/रेशा/३४/३११६/२०२०, दिनांक १७/०८/२०२०.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, पुणे यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेऊन पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यातील खालील इतर जिल्हा मार्ग, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | रा.म. ५४८ डी पासून इंदुरी नानोली तर्फे चाकण आंबी मंगरुळ आंबळे निगडे कल्हाट भोयरे प्रजिमा क्र. १०८ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ६१ | (०/०० ते २४/००) २४.०० कि.मी. | २४.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-२२७ |
| २. | रा.मा.१३० पासून उरसे आढे सडवली बऊर ते प्र.जि.मा.८८ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ६३ | (०/०० ते ११/००) ११.०० कि.मी. | ११.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-२२८ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३. | राकसवाडी उकसान पाले नाणेमावळ करंजगांव कांबरे नाणेमावळ वळख टाकवे खु. ते रा.म.क्र.४८ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ६५ | (०/०० ते २५/५००) २५.५०० कि.मी. | २५.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-२२९ |
| ४. | रा.मा. १३० पासून बेबडओहोळ ते आडहे बु. ते डोणे शिवणे सडवली रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ६६ | (०/०० ते १२/००) १२.०० कि.मी. | १२.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-२३० |
| ५. | प्र.जि.मा.-२६ आपटी घेवंडे ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ६९ | (०/०० ते १३/५००) १३.५०० कि.मी. | १३.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-२३१ |
| | **एकूण** | | | **८६.०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते दर्जोन्नत झाल्यास रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील पुणे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **८६.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (५२१२.२८० + ८६.०० ) म्हणजेच **५२९८.२८०.कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत ८६.०० कि.मी. ने घट होवून एकूण लांबी (१७८६.५८०-८६.००) म्हणजेच **१७००.५८० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०८०४१२१०१३८४१८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.08.04 12:14:14 +05'30'

**( ग. सं. कचरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, पुणे .
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, पुणे.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.